“महाराष्ट्र वस्तु व सेवा कर (स्थानिक प्राधिकरणांना भरपाई देण्याबाबत) अधिनियम-२०१७” अंतर्गत राज्यातील महानगरपालिकांना अनुदान वितरीत करण्याबाबत.

सन २०१८-२०१९ साठी लेखाशिर्ष (३६०४ ०९९८) खाली रक्कम रू.१४३६.१६ कोटी.(माहे जुलै -२०१८ करीता)

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक- जीएसटी-२०१८/प्र.क्र.१९/न.वि.-३२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २९ जून, २०१८.

वाचा :-

(१) वित्त विभाग महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग चार-ब, २९ जून,२०१७

(२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.६९/ अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८.

प्रस्तावना :-

केंद्र शासनाने अधिसूचित केल्यानुसार संपूर्ण देशात वस्तु व सेवा कराची अंमलबजावणी दिनांक १ जुलै, २०१७ पासून सुरू झाली आहे. त्यानुसार राज्यातही वस्तु व सेवा कराची अंमलबजावणी सुरू झाली असून, भारताचे संविधानाच्या सातव्या अनुसूचीच्या सूची-दोन मधील (राज्य सूची) पूर्वीच्या नोंद ५२ अन्वये आकारण्यात व वसूल करण्यात येणारा प्रवेश कर, जकात, स्थानिक संस्था कर,उपकर किंवा इतर कोणताही कर बंद करण्यात आला आहे. त्याअनुषंगाने स्थानिक प्राधिकरणास भरपाई देण्याबाबतचा महाराष्ट्र वस्तु व सेवा कर (स्थानिक प्राधिकरणांना भरपाई देण्याबाबत) अधिनियम-२०१७ दिनांक १ जुलै, २०१७ पासून अंमलात येत असल्याबाबत संदर्भाधीन क्र. (१) अन्वये वित्त विभागाने महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिद्ध केले आहे.सबब, “महाराष्ट्र वस्तु व सेवा कर (स्थानिक प्राधिकरणांना भरपाई देण्याबाबत) अधिनियम-२०१७” अंतर्गत राज्यातील महानगरपालिकांना भरपाई अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

“महाराष्ट्र वस्तु व सेवा कर (स्थानिक प्राधिकरणांना भरपाई देण्याबाबत) अधिनियम-२०१७” अंतर्गत राज्यातील २६ महानगरपालिकांना सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ नुसार माहे जुलै -२०१८ करीता **एकूण रक्कम रू. १४३६.१६ कोटी** इतका निधी वितरीत करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयानुसार मंजूर व वितरीत करण्यात येत असलेले हे अनुदान हे महाराष्ट्र वस्तु व सेवा कर (स्थानिक प्राधिकरणांना भरपाई देण्याबाबत) अधिनियम-२०१७ मधील तरतूदीनुसार समायोजित करण्यात येईल. तसेच सदर अनुदानातून शासकीय व निमशासकीय संस्थाची येणी-देणी वसूल अथवा समायोजित करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

**३.** या शासन निर्णयानुसार मंजूर व वितरीत करण्यात येत असलेल्या निधीचे महानगरपालिकांना वितरण करण्यासाठी श्री. सुधाकर बोबडे, उप सचिव, (न.वि.-५) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्रीमती.शैलजा स. शिरोडकर, कक्ष अधिकारी, (नवि-५) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**४.** यासंबंधीचा खर्च मागणी क्र.एफ-४, मुख्य लेखाशिर्ष ३६०४, स्थानिक स्वराज्य संस्था व पंचायत राज्य संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (०२) वस्तू व सेवा कराच्या अंमलबजावणीमुळे उद्भवणा-या महसूली तोट्याकरीता महानगरपालिकांना सहाय्य, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (३६०४ ०९९८) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-२०१९ मधील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

**५.** असे प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/अर्थ-३,दिनांक ०२ एप्रिल,२०१८ मधील लागू होणा-या सर्व अटी व शर्थींची पूर्तता करण्यात आली आहे.

**६.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.-अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दिनांक ०२ एप्रिल, २०१८ व वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.-अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३ दिनांक ३० जून, २०१७ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** प्रस्तुत शासन निर्णयानुसार वितरीत करावयाच्या निधीची रक्कम ही ७०% च्या मर्यादेत आहे.

**८.** सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५२/अर्थ-१६ दिनांक २३ फेब्रुवारी,२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**९.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२९११५५१४४९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shashikant Kashinath Sanap

Digitally signed by Shashikant Kashinath Sanap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15a77c0947426b11b7c7f646f29f3b1a483717eec6d16a0ebd196cbc7f25d62f, cn=Shashikant Kashinath Sanap
Date: 2018.06.29 12:01:08 +05'30'

**( शशिकांत का. सानप )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग,मंत्रालय मुंबई
३. सर्व आयुक्त, महानगरपालिका
४. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी, मुंबई-१८
५. सर्व विभागीय आयुक्त
६. संबधित जिल्हाधिकारी
७. मा.राज्यमंत्री (नगरविकास ) यांचे खाजगी सचिव

८. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,

९. कक्ष अधिकारी, तथा आहरण व संवितरण अधिकारी (नवि-५)

१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

११. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.

१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

१४. उप सचिव , कराधान-१ , वित्त विभाग,मंत्रालय मुंबई

१५. वित्त विभाग, व्यय-३/ कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६/नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.

१६. कार्यासन न.वि.-४ नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७. निवड नस्ती (न.वि.-३२), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

शासन निर्णय क्रमांक-जीएसटी-२०१८/प्र.क्र.१६/न.वि.-३२ सोबतचे प्रपत्र-अ

| अ.क्र. | महानगरपालिकेचे नाव | मंजूर अनुदान (रु. कोटी) |
|---|---|---|
| १ | नागपूर | ५२.५७ |
| २ | चंद्रपूर | ४.८९ |
| ३ | अमरावती | ९.७९ |
| ४ | अकोला | ५.३६ |
| ५ | औरंगाबाद | २१.१२ |
| ६ | परभणी | १.४५ |
| ७ | लातूर | १.१२ |
| ८ | नांदेड-वाघाळा | ६.१० |
| ९ | नाशिक | ७२.८३ |
| १० | मालेगाव | १२.०३ |
| ११ | धुळे | ७.६६ |
| १२ | जळगाव | ९.२२ |
| १३ | अहमदनगर | ६.८४ |
| १४ | पुणे | १३१.०६ |
| १५ | पिंपरी-चिंचवड | १२५.५७ |
| १६ | कोल्हापूर | १०.५२ |
| १७ | सोलापूर | १५.३८ |
| १८ | सांगली | ११.६८ |
| १९ | मिरा भाईंदर | १३.८१ |
| २० | वसई-विरार | २५.१० |
| २१ | भिवंडी-निजामपूर | १९.३९ |
| २२ | उल्हासनगर | १३.९३ |
| २३ | कल्याण-डोंबिवली | १४.१८ |
| २४ | ठाणे | ६०.०० |
| २५ | नवी मुंबई | ८५.४३ |
| २६ | बृहन्मुंबई | ६९९.१३ |
| एकुण | | **१४३६.१६** |